श्री.बी.एस.रामटेके,सेवानिवृत्त प्रशासकीय अधिकारी,यांचा सक्तीचा प्रतिक्षाकालावधी कर्तव्य कालावधी म्हणून मंजूर करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः संआसे-२०२१/प्र.क्र.८१/सेवा-१**

गोकुलदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
लोकमान्य टिळक मार्ग ८ वा मजला,
मंत्रालय, मुंबई-४००००१.
दिनांक : २७ एप्रिल, २०२२.

वाचा :-

१) **सहसंचालक,अर्थ व प्रशासन,आरोग्य सेवा आयुक्तलाय,मुंबई यांचे क्र. सआसे/ २(क)/ टे.१/ न.क्र. ३०/ वि.चौ./जा.क्र.५९०-९१/२०२१,दिनांक ४.२.२०२१ रोजीचे पत्र.**

२) **सार्वजनिक आरोग्य विभाग शासन आदेश क्र.विभाचौ १२०४/प्र.क्र.७२/सेवा-४ दि.७.६.२००४**

३) सार्वजनिक आरोग्य विभाग शासन आदेश क्र.विभाचौ **१२०४**/प्र.क्र.**७२**/सेवा-४ दि.**८.१.२००७**

४) **सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्र.प्रशाअ-२००७/प्र.क्र.८४/सेवा-१ दि.२६.७.२००७**

५) सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्र.विभाचौ **२०१४**/प्र.क्र.**७५**/सेवा-४ ब दि.**१८.१.२०१९**

प्रस्तावना :-

जिल्हा स्त्री रुग्णालय, अमरावती येथील स्वीय प्रपंची खात्यातील सन २००३-२००४ या वित्तीय वर्षातील रक्कम काढून मोठया प्रमाणावर नियमबाहय खरेदी केल्या प्रकरणी श्री. बी.एस.रामटेके व इतर कर्मचारी यांचे विरुध्द सामायिक विभागीय चौकशी सुरु करण्यात आली होती. या प्रकरणात श्री. रामटेके यांना वाचा क्रमांक २ येथील आदेशान्वये निलंबित करण्यात आले होते. सदर निलंबन वाचा क्रमांक ३ येथील आदेशान्वये रद्द करण्यात आले होते.

दिनांक ०८.०१.२००७ रोजी निलंबन रद्द झाल्यानंतर वाचा क्रमांक ४ येथील आदेशान्वये श्री. रामटेके यांना जिल्हा परिषद वर्धा येथे रिक्त पदी पदस्थापना देण्यात आली होती. त्यास अनुसरुन श्री. रामटेके हे दिनांक २४.८.२००७ ला (मध्यांनपूर्व) कामावर रुजू झाले होते. श्री.बी.एस.रामटेके यांचे निलंबन रद्द झाल्यानंतर दिनांक ९.१.२००७ ते २३.८.२००७ या कालावधीत पदस्थापनेविना होते. पदस्थापनेस लागणारा विलंब हा प्रशासकीय कारणास्तव झाला आहे. सदर सक्तीचा कालावधी नियमीत करण्याकरिता वाचा क्रमांक १ येथील पत्रान्वये प्राप्त झालेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

श्री. बी.एस. रामटेके, सेवानिवृत्त प्रशासकीय अधिकारी यांचा दिनांक ०९.०१.२००७ (मध्यांन पूर्व) ते दिनांक २३.८.२००७ (मध्यान नंतर) हा सक्तीचा प्रतिक्षेचा पूर्ण कालावधी म.ना.से. (सेवेच्या सर्वसाधरण शर्ती) नियम १९८१ मधील नियम ९ (१४) (एफ) नुसार "कर्तव्य कलावधी" म्हणून मंजूर करण्यात येत आहे.

श्री.बी.एस.रामटेके, सेवानिवृत्त प्रशासकीय अधिकारी यांना उपरोक्त कालावधीमध्ये प्रशासकीय कारणास्तव पदस्थापनेकरिता सक्तीने प्रतिक्षेत रहावे लागले. याकरिता ते व्यक्तीश: जबाबदार नाही. सदर कालावधीतील अनुज्ञेय वेतन व भत्ते अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

सदरहू शासन निर्णय हा वित्त विभाग क्रमांक सेनिवे-**१००१/१३०/**सेवा-**४,** दिनांक **२.६.२००३** अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार सक्षम प्राधिका-याच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२१७१७४३५२३४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PREMANAND DYANESHWAR SONTAKKE

Digitally signed by PREMANAND DYANESHWAR SONTAKKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=248f3abd919bce9c4e68555abc7e467b111c53a87e167edcc566a40a12ae53cd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=89357E84059779C4AD0939BABA47BE1D7999CB1D37B914BDF76F412B21AAC1AF, cn=PREMANAND DYANESHWAR SONTAKKE
Date: 2022.04.27 15:41:02 +05'30'

**(प्रे.ज्ञा.सोनटक्के)**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त, आरोग्य सेवा तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई,
२. महालेखापाल (लेखाअनुज्ञेयता/लेखापरिक्षा),महाराष्ट्र राज्य मुंबई,नागपूर/
३. संचालक-१/२, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई/पुणे,
४. सहसंचालक आरोग्य सेवा (हि.ह.व.ज), पुणे
५. सह संचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई,
६. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, पुणे कार्यालय,
७. उप संचालक, आरोग्य सेवा मंडळ, अकोला/नागपूर.
८. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अमरावती/वर्धा
९. जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, अमरावती/वर्धा
१०. जिल्हा शल्य चिकित्सक, अमरावती/वर्धा
११. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती/वर्धा
१२. जिल्हा स्त्री रुग्णालय, अमरावती/ जिल्हा परिषद, वर्धाअधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१३. श्री.बी.एस.रामटेके, सेवानिवृत्त प्रशासकीय अधिकारी, गट-ब (संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचे मार्फत)
१४. सार्वजनिक आरोग्य विभाग निवडनस्ती - सेवा-१.